निवडसूची वर्ष २०२०-२०२१:
पोलीस उप अधीक्षक/ सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना....

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन आदेश क्र. रापोसे- १७२१/प्र.क्र.२६५/पोल-१अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०२१

संदर्भ:-१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीसीसी-२०१८/ प्र.क्र.३६६/ १६-ब, दि.७.५.२०२१

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/२/१०२०/ नि.नि.सू.-२०२०-२१/५५/२०२१, दि.१३.८.२०२१ व दि.२९.९.२०२१.

शासन आदेश :-

"पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०२०-२०२१ च्या निवडसूचीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या "नि:शस्त्र पोलीस निरीक्षक" या संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याच्या नियुक्तीचे ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण. |
|---|---|---|---|
| १. | श्री. महेंद्रकुमार रामचंद्र जानराव | लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई. | अपर पोलीस अधीक्षक (ए.ट.प.) लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई |

२. उपरोक्त पदोन्नती, मा. सर्वोच्च न्यायालय येथे दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ या प्रकरणात मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या, तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३. उक्त पदोन्नती निव्वळ तात्पुरती स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी उपरोक्त अधिकाऱ्यास नियमितपणा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४. उक्त पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यास, सध्याच्या पदावरून कार्यमुक्त करून, त्यांना पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा अन्य मा. न्यायालयाचे आदेश आणि निवडणूक आचारसंहिता विचारात घेऊन आवश्यक ती कार्यवाही करावी.

५. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२११०२९२०१७४०३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAIKWAD
KAILAS ARJUN

Digitally signed by GAIKWAD KAILAS ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, pseudonym=98E519306D20397D354BD181099105F0AC1EFDEC, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=GAIKWAD KAILAS ARJUN
Date: 2021.10.29 20:21:36 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
९. श्री. महेंद्रकुमार रामचंद्र जानराव (पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत).
१०.निवडफाईल / पोल-१(अ).